महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास बस खरेदीसाठी निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्र.एसटीसी- ०९१८/प्र.क्र.४९४ /परि-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०१ नोंव्हेबर, २०१९.

<u>वाचा :-</u> महाव्यवस्थापक (यंअ), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांचे पत्र क्र.राप/यंअ/वाहन/१८९५, दि.२३.०५.२०१९.

<u>प्रस्तावना :-</u>

राज्य शासनामार्फत महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास ७०० बसेस खरेदी करण्यासाठी निधी देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार सन २०१९-२० या अर्थसंकल्पीय वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या निधीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u>:-

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास नवीन बसेस खरेदी करण्यासाठी रु.३०.०० कोटी (अक्षरी रु.तीस कोटी फक्त) एवढा निधी या शासन निर्णयाद्वारे पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम गृह विभाग, "मागणी क्र. बी-३, लेखाशिर्ष ३०५५, मार्ग व परिवहन, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमांना सहाय्य (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांच्या आधुनिकीकरणांर्तगत बांधकाम व इतर सोयी सुविधा (३०५५ ००५२)" ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान अंतर्गत सन २०१९-२० या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून करण्यात यावे.

३. वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर निधी आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४०६/१४६१/व्यय८, दि.१३.०८.२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१९११०११५०७२४४६२९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=21524d9e84e57776ba1ee448660f3699bdd08917801a19974a72d568f57f5401, ou=HOME DEPARTMENT GOVT OF MAHARASHTRA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2019.11.01 16:50:21 +05'30'

**(नि.ज्यो.घिरटकर)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत**,

१.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३.महाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई.
५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
९.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१०.संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११/साऊ), मंत्रालय, मुंबई.
१३. गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती/कार्यासन परि-१.